डॉ. झाकीर हुसैन मदरसा आधुनिकीकरण योजनेतंर्गत
सन२०२३-२४ मधील मदरशांना निधी वितरीत करणे.
जिल्हा- वाशिम .

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०२३/प्र.क्र.१५३/का-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ०५ मार्च, २०२४.

<u>वाचा:</u>

१) शासननिर्णयक्रमांकः अविवि-२०१०/प्र.क्र.१५२/१०/का-६, दि.११.१०.२०१३
२) शासन निर्णय क्रमांक-अविवि-२०२२/प्र.क्र.३९/ भाग-१/का.६, दिनांक ३१ मे, २०२३,
३) जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, वाशिम, यांचे पत्र क्र. जा.क्र.नियो/अल्पसं/मदरसा/प्रस्ताव/६८९/२०२३, दि. ३१.८.२०२३ व दि.१३.९.२०२३.
४) शासन निर्णय क्रमांक-अविवि-२०२२/प्र.क्र.३९/भाग-१/का.६, दिनांक ०३ ऑक्टोबर, २०२३
५) शासन निर्णय क्रमांक-अविवि-२०२२/प्र.क्र. ३९/भाग-१/ का.६, दिनांक ०६ नोव्हेंबर, २०२३

<u>प्रस्तावना:-</u>

मदरशांमध्ये शिकत असलेल्या विविध वयोगटातील विद्यार्थ्यांना समाजाच्या मुख्य प्रवाहात आणण्यासाठी पारंपारिक धार्मिक शिक्षणाबरोबरच विज्ञान, गणित, समाजशास्त्र, हिंदी, मराठी, इंग्रजी व उर्दु या विषयांचे शिक्षण देणे, मुख्य प्रवाहातील शाळांमध्ये प्रवेश घेणाऱ्या इ. ९वी, १०वी, ११वी, व १२ वीतील तसेच औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी शिष्यवृत्ती देणे, परिणामी विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक गुणवत्तेमध्ये वाढ होऊन, त्यांची रोजगारक्षमता वाढून, आर्थिक दर्जा सुधारण्यास मदत व्हावी, याद्दष्टीने मदरशांच्या आधुनिकीकरणासाठी पायाभूत सुविधा, ग्रंथालयासाठी अनुदान देणे व शिक्षकांना मानधनासाठी अनुदान देण्याची, डॉ. झाकीर हुसैन मदरसा आधुनिकीकरण योजना राबविण्यास शासन निर्णय क्रमांक:- अविवि-२०१०/प्र.क्र.१५२/१०/का-६, दिनांक ११ ऑक्टोबर २०१३ अन्वये मंजूरी देण्यात आली आहे.सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार संबंधित जिल्हयांचे जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या समितीद्वारे अनुदानासाठी पात्र ठरलेल्या मदरसांना अनुदान वितरित करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

१. सन २०२३-२४ या वर्षाकरीता संबंधीत जिल्हास्तरिय समितीद्वारे अनुदानासाठी पात्र ठरविलेल्या वाशिम जिल्हयातील ०७ मदरशांना एकूण रु. २५,७७,०००/- (रूपये पंचवीस लाख सत्याहत्तर हजार फक्त)) इतके अनुदान मंजूर करण्यास याद्दवारे शासन मान्यता देण्यात येत आहे.सदर पात्र मदरशांची संख्या आणि त्यांना वितरित करण्यात येणाऱ्या अनुदानाची रक्कम यांचा तपशील पुढील प्रमाणे आहे.

**मदरशांची संख्या व अनुदानाची रक्कम .**

| अ.क्र | जिल्हा | मदरशांची संख्या | मंजूर अनुदान (रुपये लाखात) |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | वाशिम | ०७ | २५,७७,०००/- |
| | एकुण | ०७ | २५,७७,०००/- |

२. या शासन निर्णयासोबतच्या सहपत्रात दर्शविण्यात आलेल्या जिल्हयांच्या समोर नमूद करण्यात आलेले अनुदान संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे सूपूर्द करण्यात येत आहे. संबंधित जिल्हाधिकारी, यांनी त्यांच्याकडे सुपूर्द करण्यात आलेला निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून (BDS)आहरित करून संवितरित करण्यासही याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. याकरिता संबंधित जिल्हाधिकारी, हे नियंत्रक अधिकारी अणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. संबंधित जिल्हाधिकारी यांनी अथवा या कामासाठी त्यांनी प्राधिकृत केलेले त्याच्या कार्यालयातील इतर अधिकारी यांनी सोबत जोडलेल्या सहपत्राप्रमाणे शासन स्तरावर मान्य करण्यात आलेली रक्कम संबंधित मदरशांच्या राष्ट्रीयकृत बँकेतील खात्यामध्ये ई.सी.एस. द्वारे जमा करावी, आणि उर्वरित रक्कम शासकीय कोषागारात जमा करावी.

३. या योजनेंतर्गत मदरशांना चालू वर्षात ज्या विनिर्दिष्ट प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी संबंधित मदरशांनी निधी खर्ची टाकावा.

४. मदरशांना अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर संबंधित मदरशांनी अनुदान प्रत्यक्ष प्राप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे आणि त्यानंतर अनुदानाच्या विनियोगाचे परिशिष्ट “क” नुसार विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडे सादर करणे बंधनकारक आहे. सर्व संबंधित मदरशांकडून प्राप्त झालेल्या उपयोगिता प्रमाणपत्रांचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांनी परिशिष्ट “ब” नुसार शासनास तसेच महालेखापाल कार्यालयास लवकरात लवकर सादर करावा. जिल्हाधिकारी यांनी नियंत्रण अधिकारी म्हणून शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक:-एयुडी-१०८२/सीआर-९०/८४/कोष-५, दि.२४ सप्टेंबर, १९८६ नुसार सदर निधीच्या खर्चाचा ताळमेळ घालून त्याचा अहवाल शासनास सादर करावा. तसेच सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाचा संबंधित लेखाशिर्षाचा विनियोजन लेखा अहवाल दिनांक ३० सप्टेंबर, २०२४ पर्यंत शासनास निश्चितपणे सादर करावा.

५. शासन निर्णय दिनांक ११ ऑक्टोंबर, २०१३ मधील प्रतुत योजनेच्या अटी व शर्तीमधील अनुक्रमांक ८ अनुसार मदरशांमध्ये शिकणाऱ्या विद्यार्थ्यांचे दर तीन महिन्यांनी त्यांच्यासाठी नेमलेले शिक्षक मुल्यमापन

करतील. यामध्ये विद्यार्थ्यांची लेखी / तोंडी परीक्षा घेण्यात येईल व याबाबतचा अहवाल प्रत्येक मे महिन्यामध्ये शिक्षणाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करतील.

६. या योजनेंतर्गत उद्भवणाऱ्या तक्रारींचे निराकरण करण्यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील शासन निर्णय दिनांक ११.१०.२०१३ मध्ये नमूद उच्चस्तरीय निवड समितीस प्राधिकृत करण्यात येत आहे.

७. या योजनेंतर्गत होणारा खर्च " मागणी क्रमांक झेड ई-१, प्रधान लेखाशिर्ष २२३५, (०१) (३१) राज्यातील नोंदणीकत मदरशांना पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी आणि शिक्षकांना वेतनासाठी "सहायक अनुदान (कार्यक्रम), (२२३५ बी २२७) ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)- या लेखाशिर्षाखाली या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:- विअप्र-२०१३ /प्र.क्र.३० /२०१३ /विनियम भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तीका भाग-१ अन्वये प्रशासनिक विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत / विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियमपुस्तीका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०५१८२४३१९५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MEGHANA GAURAV SHINDE

Digitally signed by MEGHANA GAURAV SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d29224e30812c4523eedb32c54f5cbc27548f81ccf656192b6d735115af1dfb8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D625CF85C370BB4C35F332D5F951F0A9CD61FAD5DDF056809A969BFDD9FDB7DA, cn=MEGHANA GAURAV SHINDE
Date: 2024.03.06 17:50:35 +05'30'

**( मेघना गौरव शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
५) मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
७) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) महालेखापाल ½ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१०) महालेखापाल ½ (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर

११) जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम.
१२) जिल्हाधिकारी, वाशिम.
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम.
१४. जिल्हा नियोजन अधिकारी, वाशिम.
१५.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, वाशिम.
१६. अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. सर्व संबंधित मदरसा (जिल्हाधिकाऱ्यांमार्फत)
१८. निवडनस्ती.

**शासन निर्णय क्रमांक:- अविवि-२०२३/प्र.क्र.१५३/का-६, दि. ०५ मार्च, २०२४ सोबतचे सहपत्र**

"परिशिष्ट- अ"

| अ.क्र. | मदरशांची नावे | वितरीत करावयाचे अनुदान ( रूपये) | | | एकूण रूपये | विदयार्थी संख्या |
|---|---|---|---|---|---|---|
| | | पायाभूत सुविधा | ग्रंथालय | शिक्षकांचे मानधन | | |
| | अमरावती विभाग, जिल्हा- वाशिम. | | | | | |
| १. | हाजी अली मोहम्मद चॅरिटेबल ट्रस्ट, मानोरा, ता. मानोरा, जि. वाशिम. द्वारे संचालित हाजी दाऊद मॉडर्न मदरसा, आझाद नगर, कारंजा, जि. वाशिम. | २०००० | ५००० | २३०००० | ४३५००० | १६८+६० =२२८ |
| २. | मदरसा रौजतुल बनात, गंगू प्लॉट, वाशिम, जि. वाशिम. द्वारे संचालित मदरसा रौजतुल बनात, गंगू प्लॉट, कब्रस्तान रोड, वाशिम, जि. वाशिम. | २००००० | ५००० | २४०००० | ४४५००० | १३२+२१ =१५३ |
| ३. | मदरसा जामिया इस्लामिया फैजान ए अबरार एज्युकेशन अॅन्ड मल्टीपर्पज सोसायटी, रिसोड, ता. रिसोड, जि. वाशिम. द्वारे संचालित मदरसा जामिया इस्लामिया फैजान ए अबरार, रिसोड, ता. रिसोड, जि. वाशिम. | २००००० | ५००० | १६८००० | ३७३००० | २१+२५ =४६ |
| ४. | हज्जन हनिफा बी. चॅरिटेबल ट्रस्ट, सुभाष चौक, मंगरुळपीर, जि. वाशिम. द्वारे संचालित हनिफा मॉडर्न अरबी मदरसा, टेकडीपुरा, मंगरूळपीर, जि. वाशिम. | २००००० | ५००० | ७२००० | २७७००० | ३२+०० =३२ |
| ५. | हज्जन हनिफा बी. चॅरिटेबल ट्रस्ट, सुभाष चौक, मंगरुळपीर, जि. वाशिम. द्वारे संचालित सादिया मॉडर्न अरबी मदरसा, काजीपुरा, मंगरूळपीर, जि. वाशिम. | २००००० | ५००० | ७२००० | २७७००० | ३०+०० =३० |
| ६. | हाजी अली मोहम्मद चॅरिटेबल ट्रस्ट, मानोरा, ता. मानोरा, जि. वाशिम. द्वारे संचालित खैरून्निसा जिकर मॉडर्न मदरसा, मानोरा, ता. मानोरा, जि. वाशिम. | २००००० | ५००० | १२०००० | ३२५००० | ४६+०० =४६ |
| ७. | ख्वाजा गरीब नवाज व्यायाम क्रिडा शिक्षण व बहूउद्देशीय संस्था, शेलू बाजार, ता. मंगरूळपीर, जि. वाशिम. द्वारे संचालित ख्वाजा गरीब नवाज मॉडर्न (स्कुल) मदरसा, शेलू बाजार, ता. मंगरूळपीर, जि. वाशिम. | २००००० | ५००० | २४०००० | ४४५००० | ६२+७१= १३३ |
| | एकूण रू. २५,७७,०००/- | १४००००० | ३५००० | ११४२००० | २५७७००० | |

## "परिशिष्ट-ब"

UTILIZATION CERTIFICATE

Certificate that an amount of -------------- drawn vide-----------Dated------ under Major Head **2235 B 227** towards Grant-in-Aid from------ ---Treasury was utilized for the purpose of " **डॉ. झाकीर हुसैन मदरसा आधुनिकीकरण योजना** " as mentioned in the sanction order purpose of -------------------- dated------of the District Collector,--------

Signature of District Collector.

"परिशिष्ट-क"

उपयोगिता प्रमाणपत्र

मी/आम्ही श्री .............................................................................................. आणि श्री................................................................. असे प्रमाणित करतो की, महाराष्ट्र शासन, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई मार्फत "डॉ. झाकीर हुसैन मदरसा आधुनिकीकरण योजना " या योजनेंतर्गत आमच्या..........................................................................................या संस्थेच्या मदरसांना वर्ष २०२३ -२०२४ मध्ये मंजूर झालेल्या रु........................... (अक्षरी रुपये.....................................................) एवढया अनुदानाचा उपयोग आम्ही खालील प्रयोजनांसाठी केला आहे आणि सदर अनुदान ज्या बाबींसाठी मंजूर करण्यात आले होते त्याच प्रयोजनांसाठी खर्च करण्यात आले आहे.

| अनु.क्र. | तपशील | खर्च (रु.) |
|---|---|---|
| १ | | |
| २ | | |
| ३ | | |
| ४ | | |
| ५ | | |
| | एकूण रु. | |

आम्ही असेही प्रमाणित करतो की, सदर खर्च विहित पध्दतीचा अवलंब करुनच करण्यात आला आहे.

| अ.क्र. | पदनाम | नाव | स्वाक्षरी |
|---|---|---|---|
| १ | अध्यक्ष | | |
| २ | सचिव | | |
| ३ | मुख्याध्यापक/प्राचार्य | | |
| ४ | मुख्याधिकारी/गट शिक्षणाधिकारी / शिक्षण अधिकारी /शिक्षण निरिक्षक/ जिल्हा समाज /उपशिक्षणाधिकारी सह /१-कल्याण अधिकारी वर्ग /उच्च व तंत्र शिक्षण ,संचालक महानगरपालिका/समाजकल्याण अधिकारी/ शिक्का- | | |

पालक शिक्षण संघटना यांचे अध्यक्ष

शिक्का-

शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.अविवि-२०२३/प्र.क्र.१५३/का-६, दि. ०५ मार्च, २०२४ सोबतचे सहपत्र